

# पाकोळीचं गाणं

लियो पोलिटी



# पाकोळीचं गाणं

लियो पोलिटी



डोंगरांच्या कुशीत, समुद्राजवळ, कॅपिस्ट्रानो नावाचं छोटंसं गाव होतं.

वसंत ऋतुची प्रसन्न सकाळ होती, मिशन चर्चमध्ये घंटानाद होत होता.

मिशनच्या जवळ जुआनची शाळा होती. जुआन गावामधल्या छोटया रस्त्यावरून पळत पळत शाळेत जायला निघाला. वाटेत फुलांनी बहरलेल्या “पवित्र उदयाना”पाशी म्हातारबुवा जुलियनशी बोलायला थांबला.

"गुड मॉर्निंग, जूलियन."

"गुड मॉर्निंग, जुआन."





ज्युलिअनआजोबा मिशनची प्रसिद्ध आणि सुंदर घंटा वाजवायचं काम करीत असत. ज्युलिअनआजोबांनी जुआनला कितीतरी वेळा मिशनची कहाणी सांगितली होती. तरी दरवेळी जुआन ती गोष्ट जणू नव्याने ऐकायचा.

“खूप खूप वर्षांपूर्वी," जूलियन आजोबांनी सांगायला सुरुवात केली, "सेंट फ्रांसिसचे शिष्य समुद्र पार करून या देशात आले. फादर जुनिपेरो सेरा आणि बाकीचे शिष्य चालत चालत जंगल पार करून आले. स्थानिक इंडियंसच्या मदतीनं त्यांनी इथे मिशन चर्च बांधलं.”



"हा फादर जुनिपेरो सेरांचा पुतळा आहे." जुआन बागेतल्या मूर्तीकडे बघत म्हटला, “ते तर माझे मित्रच वाटतात."

"मिशन छोट्या गावांसारखे असायचं," जूलियनआजोबा म्हणाले, “तिथे रोजच्या वापरासाठी पायताणं, घोड्याचं खोगीर, घोंगड्या, काठ्या, मातीची भांडी बनवायचं काम इंडियन करत असत.

“हे भलंमोठं दगडी जातं आहे ना, यामध्ये मका आणि गहू दळत असत.

जुआनने जात्याच्या मोठ्या दगडावरून हात फिरवला. तो स्पर्श जुआनला फार आवडायचा. मिशनरी रुग्णांची सेवा करणारं ते छोटं रुग्णालय, चाचे-चोरांपासून गावाचं रक्षण करण्यासाठी सैनिक वापरायचे तो खंदकही त्याला आवडायचा.

शाळेतून जाता-येता जुआन मिशनच्या बागेतली फुलं बघायचा. जुन्या भिंतीपाशी डोलणारी फुलं बघून त्याला खूप आनंद व्हायचा.

जूलियनआजजोबा मिशनमध्ये माळी म्हणूनही काम करायचे. जुआनला फुलंझाडं दाखवताना त्यांना खूप आवडायचं. त्यांचं फुलझाडांवर फार प्रेम होतं. ते जीव लावून झाडांची काळजी घ्यायचे. झाडांवर सुगंधी, संदर फुलं डोलत असायची.

या झाडांवर अनेक पक्षी घरटी बांधायचे. बागेतल्या कारंज्याजवळ तहान भागवत विविध पक्षी तिथलया हिरवाईत विहरत असत. हमिंगबर्डस्, शुभ्र कबुतरं, चिमण्या असे हरत-हेचे पक्षी बागेत यायचे.

पक्ष्यांसाठी जूलियनआजोबा नेहमी खिशात भाकरतुकडा ठेवीत असत. कबुतरं त्यांच्या हातावर, खांद्यावर बसत.





तिथले सगळ्यात मनस्वी पक्षी म्हणजे पाकोळ्या. जुआनआजोबा पाकोळ्यांना त्यांच्या स्पॅनिश नावानं “लास गोलोंड्रिनास” हाक मारत असत.

शेकडो, हजारो पाकोळ्यांनी भिंतीवर, फांदयांवर घरटी बांधली होती. पाकोळ्यांच्या आवाजानं कैपिस्ट्रानो गजबजून जात असे. विशेषतः वसंत ऋतूत.

“मला आठवतय तेव्हापासून या पाकोळ्या वसंत ऋतूत, संत जोसेफ दिनी इथे येतात आणि मग उन्हाळ्यात इथून जातात," जूलियनआजोबा जुआनला सांगत होते.



“पण या छोट्याशा पाकोळ्यांना कसं कळतं संत जोसेफ दिन कधी आहे ते?" जुआनने विचारलं.

“ते मला नाही माहीत," जूलियनआजोबा म्हणाले.

जुआनला या पाकोळ्यांबद्दल फार उत्सुकता वाटत होती. या छोट्या पाकोळ्या छतावर, मातीची घरटी बांधताना त्यानं बघितलं होतं. आई पाकोळी अंडी उबवत असे आणि बाबा पाकोळी गाणं गुणगुणत असे. रात्री ते सगळे एकत्र झोपत हेही जुआनने पाहिलं होतं.

ज्युलिअनआजोबांची पाठ वळायचा अवकाश, जुआन वेलींचा आधार घेत झाडांवर चढायचा आणि घरटी बघायचा, हात न लावता घरट्यात किती अंडी आहेत ते मोजायचा. घरट्यात पिल्लं चिवचिवायला लागली की आई-बाबा पाकोळी त्यांना भरवायचे ते बघायला जुआनला भारी आवडायचं.





पाकोळीआजी जेव्हा पिल्लांना उडायला शिकवायची, ते बघणं म्हणजे जुआनला पर्वणी वाटायची.

एके सकाळी लोखंडी कमानीवर पाकोळ्या ओळीत बसल्या होत्या. पाकोळी आजी-आजोबा पिल्लांना उडण्याचे धडे देत होते.



सुरुवातीला उडण्याचा प्रयत्न करताना पिल्लांची लगबग उडाली होती.

त्यातलं एक पिल्लू उडायच्या प्रयत्नात जमिनीवर पडलं.

“अरेरे, हे पिल्लू!" जुआन ओरडला आणि पिल्लाला उचलायला धावला. त्यानं पिल्लाला हळुवारपणे ओंजळीत घेतलं आणि शांत केलं.

पिल्लाला लागलं नव्हतं याची खात्री करून जुआननं पिल्लू परत लोखंडी कमानीवर ठेवलं. पिल्लाला आता घरट्यात परत जायचं होतं. त्याला बहुधा भूक लागली होती.

उन्हाळ्यामध्ये एक दिवस पाकोळ्या खूप लगबगीत दिसत होत्या. जणू कुठे जाण्याची तयारी करत होत्या.

"जुआन!" जुलियनआजोबांनी हाक मारली, “बघ, पाकोळ्या आपल्याला सोडून चालल्या.

जुआनला खूप वाईट वाटलं, त्याला पाकोळ्यांची खूप आठवण येणार होती. प्रत्येक पाकोळीशी त्याची स्वतंत्र ओळख झाली होती. त्या जुआनच्या छोट्या मित्रमैत्रिणी होत्या.

सगळ्या पाकोळ्या गोळा झाल्या आणि आकाशात दक्षिण दिशेला उडत गेल्या. जुआन आणि जुलियनआजोबा पाकोळ्यांकडे बघत राहिले, अगदी त्या नजरेआड होईपर्यंत.



पाकोळ्या प्रवासाला निघाल्या की जूलियनआजोबा नेहमी एक गाणं म्हणायचे, ते आजही गाऊ लागले.

“जा जा पाकोळ्यांनो,

तुमची खूप आठवण येईल

सुखरूप जा

आम्ही तुमची वाट पाहू

“मी या पाकोळ्यांसाठी प्रार्थना करेन." जुआन ने कहा.

पाकोळ्या क्षितीजापार दिसेनाशा झाल्या.

“पाकोळ्यांचं आकाशात विहरणं किती अद्‌भुत दिसतं," जूलियनआजोबा म्हणाले.

"कल्पना कर जुआन, आकाशात इतक्या उंचीवर या पाकोळ्या हजारो मैल विहरतात, खाली इतका सुंदर निसर्ग दिसत असेल. मला वाटतं देवानं पाकोळीला सगळ्यात जास्त स्वातंत्र्य आणि आनंद वाटला आहे."

“पण त्या जातात कुठे?" जुआन ने पूछा.

जूलियनआजोबा म्हणाले, “काही जण म्हणतात या पाकोळ्या दक्षिणेकडे खूप दूरवर जातात. प्रशांत महासागरात एक हिरवा द्विप आहे, तिथे..."

"कोणाला नेमकं माहीत नाही, पण मला वाटतं जुआन, या पाकोळ्या जिथे जात असतील तिथे खूप फुलं, गोड्या पाण्याचे झरे असतील. लोक त्यांचं स्वागत करत असतील, त्यांच्यावर प्रेम करत असतील."



जुआनच्या मनात विचार आला, “हं, ते लोक पाकोळ्यांचं स्वागत करत असतील, त्यांच्यावर प्रेम करत असतील..मी देखील घरासमोर अशीच बाग फुलवीन, तिथे पाकोळ्या घरटी बांधतील. "

जुआनचं घर गावात मातीची घरं असतात तसंच होतं. कॅलिफोर्नियात अगदी सुरुवातीच्या काळात बनलेली घरं असायची, तसं होतं.

सुटीच्या दिवसात जुआननं बाग फुलवायचं काम सुरू केलं. जुलिअनआजोबांकडून त्यानं बाग फुलवायची कशी हे शिकून घेतलं होतं.

सगळ्यात आधी त्यानं जमीनीत खड्डे केले. मग त्याभोवती आळी केली. कडेला शिस्तशीर वीटा लावल्या. नवीन फुलझाडं लावली. जुन्या गुलाबाच्या वेलींना खांबांवर चढवलं. जवळच्या तळ्यातल्या पाण्यातला गाळ काढला.



शरद ऋतू आला तशी मिशनची बाग शांत झाली. फुलांचे रंग मिटत गेले.

मिशन अजूनही दिमाखात उभं होतं पण पाकोळ्यांची जाग नाही तर ओकंबोकं वाटत होतं.

शाळेत जाताना जुआन मिशनमध्ये थांबायचा आणि पाकोळ्यांच्या रिकाम्या घरट्यांकडे बघून उदास व्हायचा. थोड्या दिवसांपूर्वी तर या घरट्यात किती चहलपडल असायची आणि आता किती ओकंबोकं वाटतं. जुआन शाळेत एक गाणं शिकला होता, ते या घरट्यांकडे बघून गुणगुणायचा.



थंडी उतरायला लागली तशी झाडांना पालवी फुटली.

थोड्याच दिवसात झाडं फळाफुलांनी लगडलेली दिसू लागली. झाडाची पानं ऊनसावलीबरोबर खेळ खेळू लागली आणि फुलांच्या सुगंधानं हवा भारून गेली.

जुआनला वाटायचं की तो मंतरलेल्या बागेतून चालला आहे.

जूलियनआजोबा बागेत खूप खपायचे कारण संत जोसेफ दिन आता जवळ येत चालला होता. पाकोळ्या परत येतील तेव्हा बाग फुललेली असावी म्हणून आजोबा बागेत रात्रंदिवस काम करत होते.





संत जोसफ दिनाला, पहाटेच्या वेळी आकाश लाल रंगाच्या छटेनं भरून गेलं.

लवकरच सूर्य उगवला आणि दिवस लखलखून गेला.

जुआन आणि त्याचे मित्र सकाळी लवकर निघाले कारण त्यांना पाकोळ्यांच्या स्वागताला तयार राहायचं होतं. त्या दिवशी मुलांनी त्यांच्याकडचे सगळ्यात चांगले कपडे घातले आणि मुलींनी केसात फुलं माळली, चांगले कपडे घातले.

मुलं खेळ खेळत होती, गाणी म्हणत होती, नाचत होती, त्यांनी मिशनचं जेव्हा या भागावर नियंत्रण होतं तेव्हाची परिस्थिती दाखवणारं छोटं नाटुकलंही सादर केलं.

सगळीकडे उत्साहाचं वातावरण होतं मात्र मुलं अधेमधे आकाशाकडे नजर टाकत होती.

पाकोळ्या येतील ना?

मुलं तासनतास वाट बघत होती. आकाशाकडे डोळे लावून बसली होती. दुपार होत आली तरी पाकोळ्या आल्या नाहीत. मुलं वाट बघून उदास झाली. काही तर निराश होऊन घरची वाट चालू लागले.

मैदानाच्या टोकावर एक स्तंभ होता, त्यावर उभा राहून जुआन आकाशाकडे बघत होता. त्याला आभाळात दूरवर काही दिसलं.

“पाकोळ्या येताहेत!"

मुलांच्या आनंदाला उधाण आलं. लांब ठिपक्यांसारख्या दिसणा-या पाकोळ्या जवळ येऊ लागल्या. काही वेळात शेकडो पाकोळ्या मिशनच्या दिशेने झेपावू लागल्या.

जुआन पळत गेला आणि त्यानं जुलियनआजोबांना मिठी मारली. “बघा, पाकोळ्या आल्या, मला वाटलं आता त्या नाही येणार."

“थोड्या उशीरा आल्या. वाटेत वादळ आलं असेल. तुला म्हणलं होतं ना जुआन, पाकोळ्या नक्की येणार. किती खूश आहेत त्या बघ.."





लांबच्या प्रवासाहून घरी परत आल्यावर लहान मुलं जशी खूश होतील, तशाच या पाकोळ्या मिशनच्या परिसरात बागडत होत्या.

पंख फडफडवत, खुशीत गाणी म्हणत या पाकोळ्यांनी सगळं वातावरण भारून टाकलं.

जुआन आणि जूलियनआजोबा बागेत आले आणि त्यांनी मिशनची घंटा वाजवायला सुरुवात केली. गावात सगळ्यांना सांगायला हवं ना वसंताचं आगमन झालं आहे.

मुलांनी खूप खूप गाणी म्हणली.



Good Morn-ing, Mis-ter Swallow Come from far a-way



We are glad to see you On St. Joseph's Day.



Flit-ting in the sun-shine We can see you all



Build-ing up your houses On the Mis-sion wall.

अचानक जुआनला काहीतरी आठवलं आणि त्याला घरी जाण्याची ओढ लागली.

"जूलियनआजोबा, मी जातो," तो म्हणाला आणि घाईघाईत घरी जायच्या रस्त्याला लागला.

जसा घरी पोहोचला, तसा त्याच्या मनात आनंद मावेना. त्याचं स्वप्न होतं, अगदी तसंच घडलं होतं. पाकोळ्यांनी त्याच्या बागेतही गर्दी केली होती, घरटी बनवायली घेतली होती.





त्या रात्री जुआनने खिडकीबाहेर पाहिलं, दोन पाकोळ्या बाहेरच्या गुलाबाच्या वेलीवर झोपल्या होत्या. त्या जुआनच्या अगदी जवळ होत्या. जुआनचं पाकोळ्यांवर विलक्षण प्रेम होतं. जणू त्याचे जवळचे मित्र खूप दिवसांनंतर राहायला आले होते.

टिपूर चांदण्यामध्ये रात्र शांत होत होती. लांबून एक गीत कानावर पडत होतं.

जूलियनआजोबा पाकोळ्यांसाठी गाणं म्हणत होते.